गळीत हंगाम २०२१-२०२२ मध्ये उत्पादीत होणाऱ्या अतिरिक्त ऊसाचे गाळप करण्यासाठी ऊस वाहतूक अनुदान व ऊस गाळप अनुदान मंजूर करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- ससाका-०६२२/प्र.क्र. १७९/२५-स,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- ३० /०३/२०२३.

वाचा:-

१. शासन निर्णय, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. ससाका-०४२२/प्र.क्र.११२/२५-स, दि.२५/०५/२०२२
२. साखर आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र.सा.आ./विकास/ पुरवणी मागणी/४१४/२०२२, दि.०२/०६/२०२२.
३. शासन निर्णय, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. पुरक १९२२/ प्र.क्र.२६/१७-स दि.३०/८/२०२२.
४. शासन निर्णय, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. ससाका-०६२२/प्र.क्र.१७९/२५-स दि.२४/०१/२०२३
५. साखर आयुक्त पुणे यांचे पत्र क्र.साआ/विकास/कक्ष ११/ऊस गाळप अनुदान/१४०/२०२३, दि.२७/०३/२०२३.

**प्रस्तावना** :

सन-२०२१-२२ च्या ऊस गाळप हंगामामध्ये उत्पादित होणाऱ्या अतिरिक्त ऊसाचे गाळप करण्यासाठी ऊस वाहतूक अनुदान व ऊस गाळप अनुदान वितरित करण्यासाठी व्ही-२ मुख्य लेखाशिर्ष (२४२५ ०९८९) (०३) सहकारी साखर कारखाने, (०३) (०२) सहकारी साखर कारखान्यांना सहाय्यक अनुदान (कार्यक्रम), ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) अंतर्गत सन-२०२२-२३ मध्ये रू.१२४.०० कोटीची अतिरिक्त पुरक मागणी संदर्भ क्र.३ अन्वये मंजूर करण्यात आली होती. सदरहू पुरक मागणीद्वारे मंजूर निधीच्या उपलब्धतेच्या अधिन राहून याच लेखाशिर्षाअंतर्गत सॉफ्टलोन या प्रयोजनास्तव उपलब्ध मूळ अर्थसंकल्पीत तरतूद रू. ५१.४४ कोटी चा निधी संदर्भ क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये साखर आयुक्त कार्यालयास उपलब्ध करून देण्यात आला आहे. सदरहू निधीमधून ऊस वाहतूकीसाठी रू.६.१२ कोटी तसेच ऊस गाळपासाठी रू.४५.३२ कोटी इतके अनुदान साखर आयुक्तांमार्फत वितरित करण्यात आले आहे. आता साखर आयुक्तांच्या संदर्भ क्र. ५ येथील प्रस्तावान्वये त्यांनी ऊस गाळप हंगाम सन-२०२१-२२ मध्ये उत्पादित झालेल्या अतिरिक्त ऊसाचे गाळप करण्यासाठी रू.५४.७२ कोटी इतक्या निधीची मागणी केली आहे. संदर्भ क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये तात्पुरत्या स्वरूपात वापरण्यास अनुमती दिलेली सॉफ्ट लोन या प्रयोजनासाठीची रू.५१.४४ कोटी इतकी रक्कम त्या प्रयोजनासाठी वळती करण्याची तसेच साखर आयुक्तांच्या प्रस्तावानुसार रू.५४.७२ कोटी त्यांना उपलब्ध करून देण्यासाठी असे एकूण रू.१०६.१६४२ कोटी निधी वितरणास वित्त विभागाने मान्यता दिली आहे. त्यापैकी ऊस गाळप या प्रयोजनासाठी रू.५४.७२ कोटी इतका निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:**

आता या शासन निर्णयान्वये मागणी क्र.व्ही-२ मुख्य लेखाशीर्ष (२४२५ ०९८९) (०३) सहकारी साखर कारखाने, (०३) (०२) सहकारी साखर कारखान्यांना सहायक अनुदान (कार्यक्रम), ३१- सहायक अनुदाने

(वेतनेत्तर) या लेखाशीर्षातंर्गत रू. १०६.१६ कोटी निधीपैकी सन-२०२१-२२ च्या ऊस गाळप हंगामामध्ये उत्पादित झालेल्या अतिरिक्त ऊसाचे गाळप करण्यासाठी ऊस गाळप अनुदान रू. ५४,७२,४२,९४९ कोटी (अक्षरी रू. चौपन्न कोटी वहात्तर लक्ष बेचाळीस हजार नऊशे एकोणपन्नास फक्त) निधी वितरणास मान्यता देण्यात येत आहे.

३. ऊस गाळपाबाबत दि.१ मे, २०२२ नंतर गाळप झालेल्या ऊसाचे कारखानानिहाय प्रत्यक्ष झालेले गाळप विचारात घेवून साखर आयुक्तालयाने अनुदान वितरित करावे.याबाबत भविष्यात प्रश्न उद्भवल्यास याबाबतची सर्व जबाबदारी साखर आयुक्त कार्यालयाची राहील.

४. प्रस्तुत प्रकरणी लेखाधिकारी, साखर आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे यांना "आहरण व संवितरण अधिकारी" व संचालक (प्रशासन), साखर आयुक्तालय, साखर संकुल, पुणे यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. सदरहू निधी ऊस वाहतूक अनुदान व ऊस गाळप अनुदान या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आला आहे. यास्तव त्याच प्रयोजनासाठी त्याचा विनियोग करण्याची तसेच निधीच्या विनियोगानंतर उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्याची दक्षता आहरण व संवितरण अधिकारी व लेखाधिकारी यांनी घ्यावी.

५. प्रस्तूत शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१८२/ का-१४३१,दि.२५/०३/२०२३ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२९०/व्यय-२, दि.२८/०३/२०२३ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

प्रस्तूत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा संकेतांक २०२३०३३०१६००१०५९०२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

SHINGADE ANKUSH PANDURANG

Digitally signed by SHINGADE ANKUSH PANDURANG
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=0619305c0a0825664efa457ffa51c3f2364841c81f8c437078a333b7111446a2, pseudonym=18BA78965A42BF3AA081DE760471DB6306C88F1D, serialNumber=E11F71FCAC231B0F91F430636DE14F6C49B569D173346155B9208DCD97DD078B, cn=SHINGADE ANKUSH PANDURANG
Date: 2023.03.30 16:04:38 +05'30'

**( अंकुश पां. शिंगाडे )**
**उपसचिव , महाराष्ट्र शासन**

**प्रत माहितीसाठी :-**

१) मा. मुख्यमंत्री
२) मा. उप मुख्यमंत्री
३) मा. मंत्री (सहकार)
४) मा. विरोधी पक्षनेता (विधानसभा/ विधानपरिषद)
३) अपर मुख्य सचिव ( वित्त ), मंत्रालय, मुंबई-४०००३२
४) अपर मुख्य सचिव ( सहकार व पणन ), मंत्रालय, मुंबई-४०००३२
५) सर्व विभागीय आयुक्त
६) प्रधान महालेखाकार ( लेखा परिक्षा-१), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) प्रधान महालेखाकार Vauchee level Computor Section (VLC) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८) प्रधानलेखाकार (वाणिज्यिक ) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९) साखर आयुक्त, पुणे ( ३प्रती )

१०) सर्व जिल्हाधिकारी
११) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१२) सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य, पुणे
१३) सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था
१४) सर्व प्रादेशिक सहसंचालक, (साखर)
१५) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था (सर्व)
१६) नियोजन विभाग (का-१४३१) मंत्रालय, मुंबई-३२.
१७) वित्त विभाग व्यय -२/अर्थसंकल्प-३/ हमी शाखा, मंत्रालय,मुंबई
१८) अध्यक्ष /कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य, सहकारी बँक मर्या. मुंबई.
१९) सर्व अध्यक्ष/ कार्यकारी संचालक जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक.
२०) अवर सचिव, ३-स,/१७-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१९) निवडनस्ती २५-स, ३-स.